सन २०१३-१४ मध्ये भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत १६ साठवण बंधाऱ्याच्या कामाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१३/प्र.क्र.१८७/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: ०७/११/२०१४

वाचा-

१) **शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१३/प्र.क्र.६९/का-१९ दि. १४/०६/२०१४**

प्रस्तावना -

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सन २०१३-१४ साठी केंद्र शासनाकडुन भांडवली मालमत्ता अनुदानाच्या हप्त्यापोटी रु. ४८२३.७० लक्ष उपलब्ध करण्यात आले असुन सदर निधी खर्चासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वाचा येथील शासन निर्णयान्वये सुपुर्द करण्यात आला आहे. यातील धुळे जिल्हयातील साठवण बंधाऱ्याच्या कामाच्या रु.१७०.४८ लक्षच्या १६ कामांच्या आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सादर केलेल्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

प्रस्तुत निर्णयाद्वारे धुळे जिल्हयातील साठवण बंधाऱ्यांच्या खालील तालिकेतील १६ कामांच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना खालील अटींचे अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर बांधकामाचे बाबतीत खालील अटींची पुर्तता करण्यात यावी.

(१) लाभ धारकांनी उचल पद्धतीने स्वखर्चाने सिंचन करणे अपेक्षित असल्यास लाभधारकांकडुन संमत्तीपत्र घ्यावे

(२) ३.७५% Preparation Scrutiny Charges व for Contingencies असा वेगवेगळा अतिरीक्त भार देण्यापेक्षा अनुषंगिक खर्चाची तरतुद कायम ठेवण्यात यावी.

(३) Regeneration Flood चे निष्काषण मुख्य अभियंता ,जलसंधारण यांची मान्यता घेउन निश्चीत करावे. तसेच खर्च मंजुर निधीच्या मर्यादेतच करावा.

३. या कामांची निविदा प्रक्रिया प्रचलित कार्यपद्धती / नियमांचे पालन करुन करावी .तसेच बांधकामासंबधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवाल शासनास विहित प्रपत्रात सादर करावे . प्रस्तुतची कामे पूर्ण झाल्यानंतर कामाच्या ठिकाणी सदरील काम केंदीय योजनेतून पूर्ण केले असल्याबाबतचा फलक लावण्यात यावा.

| अ.क्र.. | कामाचा तपशील | कामाप्रित्यर्थ अंदाजित खर्च(रू.लक्ष ) |
|---|---|---|
| १. | साठवण बंधारा धंगाई (दापूर)ता.साक्री जि.धुळे | १०.६६ |
| २. | साठवण बंधारा मोहाणे-१,ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ३. | साठवण बंधारा पिंझारझाडी,ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ४. | साठवण बंधारा रायकोट क्र-१,ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ५. | साठवण बंधारा रायकोट (लाग्गडवड),ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ६. | साठवण बंधारा चिपीपाडा क्र.३,ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ७. | साठवण बंधारा नवागाव (बसरावळ),ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ८. | साठवण बंधारा सिंदबन क्र.६,ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| ९. | साठवण बंधारा नवागाव (उडयावडनाला), ता.साक्री जि.धुळे | १०.६६ |
| १०. | साठवण बंधारा पापडसोंडा,ता.साक्री जि.धुळे | १०.६७ |
| ११. | साठवण बंधारा धामंधर,ता.साक्री जि.धुळे | १०.६६ |
| १२. | साठवण बंधारा देवळीपाडा(जामखेडी नदी) , ता.साक्री जि.धुळे | १०.६६ |
| १३. | साठवण बंधारा केळीपाडा,ता.साक्री जि.धुळे | १०.६९ |
| १४. | साठवण बंधारा नांदर्खी क्र.१,ता.साक्री जि.धुळे | १०.६२ |
| १५. | साठवण बंधारा मादलीपाडा क्र.२,ता.साक्री जि.धुळे | १०.६७ |
| १६. | साठवण बंधारा पिंपळसोडा (नांदर्खी क्र.२), ता.साक्री जि.धुळे | १०.६५ |
| | एकूण | १७०.४८ |

४. सदर शासन निर्णय ग्राम विकास विभाग व जलसंधारण विभागाच्या सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ ,भाग पहीला ,उपविभाग -तीन ,परीच्छेद (२)२७ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०११२९५३६०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2014.11.10 11:37:39 +05'30'

मनोजकुमार महाले
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. खाजगी सचिव,मा.मंत्री आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई

२. खाजगी सचिव,मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
५. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. आयुक्त,आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
७. मुख्य अभियंता,जलसंधारण विभाग, पुणे.
८. उपसचिव,आदिवासी विकास,मंत्रालय, मुंबई
९. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०.निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई